**मृद सर्वेक्षण अधिकारी पदावर समावेशनाने पदस्थापनेबाबत..**

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग
## शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०१७/(३०२/२०१७)/आ.(वर्ग-१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०२ नोव्हेंबर, २०१८.

संदर्भ :- १. मृद व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.आस्थाप-२०१६/(प्र.क्र.८८(भाग-९)/जल-२, दि.३१.०५.२०१७.
२. जलसंपदा विभाग, शासन पत्र क्र.संकीर्ण-२०१७/(प्र.क्र.३०२/२०१७)/आ(वर्ग-१), दि.३१.०८.२०१७.
३. जलसंपदा विभाग, शासन पत्र क्र.संकीर्ण-२०१७/(प्र.क्र.३०२/२०१७)/आ(वर्ग-१), दि.३०.०५.२०१८.

**शासन आदेश :-**

मृद व जलसंधारण विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.३१.०५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयास अनुसरून श्री.बाळासाहेब खंडू देशमुख, मृद सर्वेक्षण अधिकारी यांनी त्या विभागात कायम स्वरूपी समायोजनाकरीता शासनास दि.०५.०७.२०१७ रोजी विकल्प सादर केला होता. त्यानुषंगाने याबाबत सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेऊन सदंर्भ क्र.२ येथील शासनाच्या दि.३१.०८.२०१७ रोजीच्या पत्रान्वये श्री.देशमुख यांची सेवा मृद व जलसंधारण विभागात वर्ग करण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र.३ येथील दि.३०.०५.२०१८ रोजीच्या शासन पत्रान्वये श्री.देशमुख यांना मृद व जलसंधारण विभागात रूजू होण्याकरीता या विभागातून कार्यमुक्त करण्यात आले होते.

२. तथापि, मृद व जलसंधारण विभागाने असे कळविले आहे की, त्या विभागाच्या दि.३१.०५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार कृषि विभागाकडून मृद व जलसंधारण विभागाकडे वर्ग करावयाची पदे अद्यापी वर्ग करण्यात आलेली नाहीत. त्यामुळे कृषि विभागातून मृद व जलसंधारण विभागाचा विकल्प दिलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना अद्याप मृद व जलसंधारण विभागाचे अधिकारी/कर्मचारी म्हणून घोषित करण्यात आलेले नाही. तसेच श्री.देशमुख यांनी मृद संधारण यंत्रणेतील जिल्हा मृदसंधारण अधिकारी या पदाचा विकल्प दिलेला आहे. त्यामुळे श्री.देशमुख यांना जिल्हा मृदसंधारण अधिकारी या पदावर पदस्थापना देता येत नाही. यास्तव, श्री.देशमुख यांना मृद व जलसंधारण विभागाकडून पदस्थापनेचे आदेश निर्गमित करण्यात येईपर्यंत जलसंपदा विभागाच्या आस्थापनेवर कार्यरत ठेवण्याची विनंती मृद व जलसंधारण विभागाने केली आहे.

३. यास्तव, श्री.बाळासाहेब खंडू देशमुख यांचे खालील अटींच्या अधीन राहून जलसंपदा विभागात तात्पुरत्या स्वरूपात समावेशन करण्यात येत असून त्यांना रिक्त पदी पदस्थापना देण्यात येत आहे.

१. श्री.देशमुख यांनी या पूर्वी मृद व जलसंधारण विभागाकडे समायोजन होण्याकरीता दिलेला विकल्प रद्द करता येणार नाही.

२. मृद व जलसंधारण विभागाने श्री.देशमुख यांचे सविस्तर पदस्थापनेबाबतचे आदेश निर्गमित केल्यानंतर त्या विभागात रुजू होण्याकरीता श्री.देशमुख यांना तात्काळ कार्यमुक्त करण्यात येईल.

३. उपमृद सर्वेक्षण अधिकारी या निम्न संवर्गातील अधिकारी मृद सर्वेक्षण अधिकारी पदावरील पदोन्नतीस पात्र ठरल्यानंतर मृद व जलसंधारण विभागात रुजू होण्याकरीता श्री.देशमुख यांना कार्यमुक्त करण्यात येईल.

४. यास्तव, प्रशासकीय कारणास्तव, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने श्री.देशमुख यांची जलसंपदा विभागातील मृद सर्वेक्षण अधिकारी या संवर्गात खाली दर्शविल्याप्रमाणे सविस्तर पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | समावेशनाने पदस्थापनेच पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.बाळासाहेब खंडू देशमुख | पदस्थापनेविना | मृद सर्वेक्षण अधिकारी, मृद सर्वेक्षण विभाग, पुणे. | बदली अधिनियमातील कलम ४(५) विनंतीनुसार |

५. संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती/पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास आपल्या नवीन नियुक्तीच्या जागी तात्काळ हजर करून घ्यावे. तसेच संबंधीत अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडी त्वरित कळवावे.

६. सदरहू पदस्थापनेच्या आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून पदस्थापना रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०२१२४६५९६२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Namdeo Jadhav

Digitally signed by Sanjay Namdeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5459d36186f52b61cb47b4246001e4c0bbd80c48f89adea8f0037e8608934214, serialNumber=5d495c041ec26693ec8970305b3bf74fd0e430fcd53917c7f440a44ac2dc6a30, cn=Sanjay Namdeo Jadhav
Date: 2018.11.02 12:52:38 +05'30'

**( संजय जाधव )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जसंव्य व लाक्षेवि)/सचिव(प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
४. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण), पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
८. सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
९. अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे.
१०. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
११. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४. संबंधीत अधिकारी.
१५. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.